**सर्व अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील शिक्षक / अधिकारी व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना कार्यालयीन उपस्थितीसाठी संगणकीय नोंदणी कार्डस प्रणाली (Bio Metric Card System) लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्रशिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र.संकीर्ण -२०१०/(६८७/१०)विशि-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ५ जानेवारी, २०११

वाचा : सा.प्र.वि.चे परिपत्रक क्र.सीओएम-२००१/प्र.क्र.२९४/साप्रवि/३९ दि.२७ मार्च,२००३

**प्रस्तावना :** राज्य शासनाच्या सर्व विभागामध्ये तसेच मंत्रालयीन विभागामध्ये अधिकारी व कर्मचाऱ्यांची कार्यालयीन उपस्थिती नियमितपणे असावी व त्यावर विभागप्रमुखाचे नियंत्रण असावे, त्या दृष्टीकोनातून संगणकीय नोंदणी कार्डसप्रणाली (Bio Metric Card System) शासनाच्या दि.२ सप्टेंबर, २००२ च्या निर्णयानुसार अनिवार्य करण्यात आली आहे. त्याप्रमाणे सर्व अधिकारी व कर्मचारी यांना सदर कार्डस प्रणालीप्रमाणे उपस्थिती नोंदविण्यासाठी ओळखपत्र देण्यात आले आहे.

२. सदर प्रकरणी सर्व अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांच्या सर्व संबंधीत शिक्षक /अधिकारी / कर्मचाऱ्यांची संख्या खूप मोठी असून, त्यांना जुन्या मस्टर प्रणालीनुसार उपस्थिती दर्शविण्याची पध्दत अंमलात आहे. त्यामुळे या उपस्थिती पत्रकावर संबंधित शिक्षक /अधिकारी व कर्मचारी त्यांच्या वैयक्तिक सोयीप्रमाणे सहया व नोंदी घेत असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील शिक्षक /अधिकारी / कर्मचारी यांना कार्यालयीन उपस्थितीसाठी संगणकीय नोंदणी कार्डस प्रणाली (Bio Metric Card System) लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सदर बाबींचा साकल्याने विचार करुन शासनाने सर्व अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील शिक्षक / अधिकारी व कर्मचारी यांना कार्यालयीन उपस्थितीसाठी ही संगणकीय नोंदणी कार्डस प्रणाली (Bio Metric Card System) लागू करण्यात येत आहे. सदर बायोमेट्रिक यंत्रणेची अंमलबजावणी खालील निदेशानुसार करण्यात यावी.

(अ) (i) ज्या अकृषी विद्यापीठामध्ये / संलग्नित महाविद्यालयामध्ये संपूर्ण प्रशासकीय कामकाजासाठी संगणकीय यंत्रणा (Computerise System) बसविण्यात आली आहे. अशा विद्यापीठाच्या व संलग्नित महाविद्यालयाच्या संगणक यंत्रणावर लॅन (LAN) बसविण्यात आल्यास ही बायोमेट्रीक सिस्टिम त्वरीत अंमलात आणणे शक्य होईल. त्यासाठी विद्यापीठाने / संलग्नीत महाविद्यालयांनी फक्त LAN अथवा GPRS यंत्रणेची जोडणी संबंधीत शासनमान्य कंत्राटदाराच्या माध्यमातून करुन घेणे आवश्यक आहे.

(ii) ज्या अकृषी विद्यापीठामध्ये / संलग्नित महाविद्यालयामध्ये संगणक यंत्रणा बसविण्यात आली आहे. परंतु तेथे LAN अथवा GPRS कार्ड यंत्रणा बसविण्यात आली नाही अशा ठिकाणी LAN अथवा GPRS यंत्रणेबरोबरच बायोमेट्रीक सिस्टीम बसविण्यासाठी संबधीत कंत्राटदाराच्या माध्यमातून आवश्यक ती यंत्रणा दरकरार पत्रकानुसार बसवून घेणे आवश्यक आहे.

(iii) ज्या अकृषी विद्यापीठामध्ये / संलग्नित महाविद्यालयामध्ये संगणक यंत्रणा बसविण्यात आली नाही त्या ठिकाणी संगणक यंत्रणा विकत घेण्याबरोबरच GPRS कार्ड व बायोमेट्रीक यंत्रणा शासनमान्य कंत्राटदाराच्या माध्यमातून बसविण्याच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही करणे अपेक्षित आहे. तथापि संगणकाची खरेदी विभागाच्या दरकरारानुसार करावी.

(ब) सर्व अकृषि विद्यापीठे / संलग्नित महाविद्यालयामध्ये ही बायोमेट्रीक यंत्रणा बसवितांना ती शिक्षक कक्ष (Staff Room) , प्रशासकीय इमारतीचा दर्शनी भाग तसेच प्राचार्य / कुलसचिवांचे कार्यालय /

विभागप्रमुखांचे कार्यालय अशा सुरक्षित व सहजपणे दिसेल अशा ठिकाणी सदर यंत्रणा बसविण्याची दक्षता विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांकडून घेण्यात यावी.

(क) या संदर्भात सर्व अकृषि विद्यापीठांना असे निर्देश देण्यात येत आहे की, अकृषि विद्यापीठाच्या व संलग्नित विद्यापीठातील शिक्षक संवर्ग / अधिकारी व कर्मचारी यांच्या कार्यालयीन उपस्थितीमध्ये सातत्य असावे, त्या दृष्टीकोनातून ही संगणकीय कार्ड नोंदणी प्रणाली (Bio Metric Card System) लागू करण्यात येत असल्याचे त्यांच्या अधिक्षेत्रातील सर्व संलग्नित महाविद्यालयांना निर्देश देऊन ही यंत्रणा शासनमान्य दरकरारावर उपलब्ध असलेल्या कंत्राटदाराच्या माध्यमातून बसवून घेण्याची दक्षता घ्यावी. या संदर्भात विभागीय सहसंचालक ( उच्च शिक्षण ) यांच्या माध्यमातून सदर योजना तात्काळ अंमलात आणावी व विद्यापीठाच्या / संलग्नित महाविद्यालयाच्या सर्व शिक्षक / अधिकारी / कर्मचारी यांना आवश्यक असलेले ओळखपत्र / कार्डस उपलब्ध करुन देण्याची व्यवस्था करावी.

सदर संगणकीय कार्ड नोंदणी प्रणालीसाठी (Bio Metric Card System) आवश्यक असलेली यंत्रसामुग्री शासनाच्या दरपत्रकावरील (Rate Contract) कंत्राटदाराच्या माध्यमातून उपलब्ध करण्यात येते. त्यासाठी आवश्यक असलेले हार्डवेअर, संगणक यंत्रणा, लॅन (LAN) जी.पी.आर.एस.प्रणाली तसेच इतर सर्व तंत्रज्ञान अगदी माफक दरात उपलब्ध करुन देण्यात येतात. त्यासाठी शासनाच्या संकेत स्थळावरील www.mah.gov.in माहितीनुसार आवश्यक ते तपशिल व दरकरारपत्रक उपलब्ध असून बायोमेट्रीक हजेरी प्रणालीकरीता सदर कंत्रांट दि.३० ऑक्टोबर, २०१० रोजी करण्यात आला आहे. या संदर्भात विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालय / संस्थांनी त्यांच्या गरजेनुसार संबंधीत कंत्राटदार व पुरवठादारांकडील उपलब्ध तंत्रज्ञान व यंत्रसामुग्रीची निवड करण्यात यावी. सदर प्रणाली कार्यरत करण्यासाठी येणारा संपूर्ण खर्च सर्व अकृषि विद्यापीठाने व संलग्नित महाविद्यालयानी त्यांच्याकडे चालू आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवावा.

सदर शासन निर्णय माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.निरंक, दि.३.११.२०१० अन्वये दिलेल्या अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्रमांक २०११०१०५१९२८२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

( रा.गो.जाधव )
शासनाचे उपसचिव

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे
५) सर्व अकृषि विद्यापीठांचे संचालक, बी.सी.यु.डी.
६) महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
७) महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०) मा. मंत्री ,(उ.व तं.शि), यांचे खाजगी सचिव
११) मा. राज्यमंत्री, (उ.व तं. शि.), यांचे खाजगी सचिव.
१२) मा.सचिव , उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक
१३) सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग
१४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५) संचालक, तंत्रशिक्षण / व्यवसाय शिक्षण / कला / ग्रंथालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१७) सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण / तंत्रशिक्षण /व्यवसाय शिक्षण / कला / ग्रंथालय,
१८) सर्व कार्यासन अधिकारी, उच्च व तंत्रशिक्षण विभाग
१९) निवड धारिका विशि-३

D:\DS\vishi 3\G.R\BioMetric for Uni.-Colleges.doc